**करवली, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील प्रस्तावित घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेस अभिकर्ता यंत्रणा म्हणून नेमणूक करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरपीए २०१८/प्र.क्र. १६३/भाग-१/र-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २२ नोव्हेंबर,२०१८

**वाचा:- महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आरपीए २०१८/प्रक्र.१६३/र-३, दि.०२.०८.२०१८**

**प्रस्तावना:-**

मुंबई येथील घनकचऱ्याची समस्या सोडविण्यासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी करवली, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील ३८.८७ हेक्टर शासकीय जमीनीची आवश्यकता असून सदर जमिनीवरील बांधकामधारकांना प्रकल्पग्रस्त म्हणून समजण्याबाबत तसेच त्यांच्या पुनर्वसनासाठी उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), ठाणे यांना प्राधिकृत करण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक ०२ ऑगस्ट, २०१८ रोजी प्रसिध्द करण्यात आला आहे. या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेस “अभिकर्ता यंत्रणा” म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती,

**शासन निर्णय:-**

मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २९ ऑक्टोंबर, २०१८ रोजीच्या बैठकीत करवली, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील प्रस्तावित घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी बृहन्मुंबई महानगरपालिका प्रकल्प यंत्रणा असल्याने, प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन करण्याकरिता बृहन्मुंबई महानगरपालिकेने “अभिकर्ता यंत्रणा” म्हणून कार्यवाही करावी, असे विचारविनिमय होऊन ठरविण्यात आले आहे. या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेस करवली, ता. अंबरनाथ, जि.ठाणे येथील प्रस्तावित घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी “ अभिकर्ता यंत्रणा” म्हणून घोषित करण्यात येत आहे. अभिकर्ता यंत्रणा म्हणून प्रकल्पग्रस्तांना नियमानुसार अनुज्ञेय सर्व लाभ देणे, पुनर्वसनासाठी नागरी सुविधांचा आराखडा तयार करणे, त्यासाठी आर्थिक तरतूद करणे, आराखड्यानुसार नागरी सुविधा निर्माण करणे, यासह सर्व आवश्यक बाबींची पूर्तता करून प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन करण्याची संपूर्ण जबाबदारी बृहन्मुंबई महानगरपालिकेने पार पाडावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१६३७५११४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prasannakumar Sadananda Thakur

Digitally signed by Prasannakumar Sadananda Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26565a6d8174436db1bdfcb621149f27a964fce785ca930cb445005a14b2f34d, cn=Prasannakumar Sadananda Thakur
Date: 2018.11.22 16:44:32 +05'30'

**( प्र.स.ठाकूर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, मदत व पुनर्वसन, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
६. अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
११. आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१२. जिल्हाधिकारी ठाणे.
१३. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, ठाणे.
१४. अवर सचिव, नवि-२१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (कार्यासन र-३)